अहमदनगर जिल्हयातील अहमदनगर येथे सन २०१५-१६ दि.१९/४/२०१५ ते दि.१/५/२०१५ या कालावधीत झालेल्या पर्यटन व सांस्कृतिक कला महोत्सवासाठी निधी उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : टिडीएम २०१४/१/प्र.क्र.६९/पर्यटन,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ९ नोव्हेंबर, २०१५.

**संदर्भ**:- १) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे पत्र क्र. जिनिस/पर्यटन महोत्सव/सांस-१/१८८५/२०१५, दि.३/८/२०१५.

**शासन निर्णय** :

महाराष्ट्र राज्यातील पर्यटन स्थळांची राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर प्रसिध्दी व त्याच्या विकासास उत्तेजन देणे, निरनिराळे पर्यटन महोत्सव साजरे करणे यासाठी सन २०१५-१६ मध्ये मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्रमांक झेडडी -४, ३४५२-पर्यटन, ०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०४) प्रसिध्दी (३४५२ १९३ १) ३१, सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली रु.१९.६० कोटी माहे, नोव्हेंबर, २०१५ अखेर वितरणास उपलब्ध आहेत. रु.१९.६० कोटीपैकी रु.५.०० लक्ष वितरीत केला आहे. उर्वरित निधी रक्कम रु.१९.५५ कोटी इतका निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत करण्यात येणार असून सदर तरतूदीतुन अहमदनगर जिल्हयातील अहमदनगर येथे दि.१९/४/२०१५ ते दि.१/५/२०१५ या कालावधीत झालेल्या पर्यटन व सांस्कृतिक कला महोत्सवाचा खर्च भागविण्यासाठी रुपये ५.०० लक्ष (अक्षरी रुपये : पाच लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. अहमदनगर जिल्हयातील अहमदनगर येथे दि.१९/४/२०१५ ते दि.१/५/२०१५ या कालावधीत झालेल्या पर्यटन व सांस्कृतिक कला महोत्सवाचा खर्च भागविण्यासाठी रुपये ५.०० लक्ष (अक्षरी रुपये : पाच लाख फक्त) इतका निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात प्रसिध्दीसाठी वितरीत करण्यात येणाऱ्या निधीतून जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देत आहे.

अटी व शर्ती :

१. जिल्हाधिकारी यांनी महोत्सव/कार्यक्रम आयोजनांची तपासणी करावी व दिलेला निधी त्याच महोत्सव आयोजनाच्या कारणास्तव खर्च झाला आहे, याची खात्री करावी.

२. ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तिय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तिय मान्यता घेणे आवश्यक आहे.

३. वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याबाबतची सर्व जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील व जादा खर्चाची प्रतिपुर्ती शासनाकडून केली जाणार नाही.

५. अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

६. सदर रक्कमेच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ घालून अहवाल शासनास सादर करावा.

७. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थस २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ मधील परिच्छेद ७ ते १८ मधील अट क्रमांक ७-अ, ७-ब मुळ प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली असून सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्पीत तरतूद उपलब्ध आहे. अट क्र. ८ च्या अटी प्रमाणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग एक अ.क्र.२७ नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागाला पुर्ण अधिकार आहेत. अट क्र. ९ प्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. तसेच अट क्र. १४ प्रमाणे मुळ प्रस्तावास मंत्रीमंडळाची मान्यता घेण्यात आली आहे. तसेच परिशिष्ट मधील तपासणी सूचीतील अ.क्र. १,२ व ३ ची पुर्तता करण्यात आली आहे. अ.क्र. ४ बाबत स्पष्ट करण्यात येते की, लेखापरीक्षक / महालेखापाल यांचे कोणतेही गंभीर अक्षेप नाहीत. तसेच इतर अट क्र. ५ ते ११ या प्रकरणी लागू होत नाहीत.

८. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०१५-१६ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष "मागणी क्रमांक झेडडी -४, "३४५२-पर्यटन', ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-

पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०४) प्रसिध्दी (३४५२ १९३ १) ३१ **सहाय्यक अनुदाने"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

९. हा शासन निर्णय, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थस-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग एक अ.क्र.२७ नियम क्र.१४९ प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सकेतांक २०१५११०९१७३२०४५७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.11.10 11:50:39 +05'30'

(र.ल.लखोटे)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३) महालेखापाल(स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा) मुंबई
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
११) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, सां. का-३, मंत्रालय, मुंबई .
१२) निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***